**शासकीय निरीक्षणगृह/विशेषगृह(मुलींचे),मुंढवा,पुणे या संस्थेस निरीक्षणगृह/विशेषगृह/बालगृह (मुलींचे) अशी मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बालगृ-२०१८/प्र.क्र.२०८/का ८**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ जानेवारी, २०१९.

**वाचा :** १) रिट याचिका क्र. १७६३/२०१८, जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे वि महाराष्ट्र शासन या याचिकेतील मा. उच्च न्यायालयाचे दि. २२.६.२०१८ चे निर्देश.

२) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. मबाविआ/बावि/का-५/२०१८-१९/मुंढवा संस्था/विशेष निरी.बालगृह/मान्यता/६६७६, दिनांक -२६.११.२०१८.

**प्रस्तावना-:**

रिट याचिका क्र. १७६३/२०१८, जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे वि. महाराष्ट्र शासन मधील दि. २२.६.२०१८ च्या निर्णयाअन्वये जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे संस्थेच्या पुणे येथील निरीक्षणगृह/बालगृहातील दाखल प्रवेशितांना इतरत्र दाखल करण्याची बाब विचाराधीन आहे. जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे यांच्या संस्थेतील मुलींना शासकीय निरीक्षणगृह/विशेषगृह(मुलींचे),मुंढवा,पुणे येथे दाखल करता येणे शक्य आहे. तथापि, या शासकीय संस्थेस सद्य:स्थितीत निरीक्षणगृह/विशेषगृह अशी मान्यता असून सदर संस्थेस निरीक्षणगृह/विशेषगृह यासह बालगृह अशी मान्यता यावी अशी शिफारस महिला व बाल विकास आयुक्तालयाच्या दि. २६.११.२०१८ च्या पत्रान्वये करण्यात आली आहे.

२. शासकीय निरीक्षणगृह/विशेषगृह (मुलींचे),मुंढवा,पुणे या संस्थेत दाखल मतीमंद प्रवेशितांना शासकीय कृपा महिला वसतीगृह,कर्जत,जि.रायगड येथे दाखल केल्याने मुंढवा येथील संस्थेत सद्य:स्थितीत प्रवेशिता नाहीत.

३. उपरोक्त वस्तुस्थिती व आयुक्तालयाची शिफारस लक्षात घेता, शासकीय निरीक्षणगृह/विशेषगृह (मुलींचे) , मुंढवा, पुणे या संस्थेस शासकीय निरीक्षणगृह/विशेषगृह/बालगृह अशी मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय निरीक्षणगृह /विशेषगृह (मुलींचे),मुंढवा ,पुणे या संस्थेस शासकीय निरीक्षणगृह/विशेषगृह/बालगृह (मुलींचे) अशी मान्यता या शासन निर्णयाअन्वये देण्यात येत आहे.

तथापि, सदर संस्थेत निरीक्षणगृह/विशेषगृहांतर्गत प्रवेशित दाखल झाल्यास संबंधितांची निवासव्यवस्था स्वतंत्र राखली जाईल आणि बालगृहातील प्रवेशित व निरीक्षणगृह/विशेषगृहांतील प्रवेशित यांचा संपर्क होणार नाही याची खबरदारी संबंधित संस्थेकडून घेणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१९०११८१४३४३२८९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2019.01.18 14:40:43 +05'30'

**( स्मिता निवतकर )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रत –**

१) मा.राज्यपाल, यांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई .
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
४) मा.सभापती/उपसभापती विधानपरिषद ,महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा /विधानपरिषद,महाराष्ट्र विधीमंडळ.
६) मा.मंत्री (म व बा वि)/ राज्यमंत्री(म व बा वि),यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई .
७) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
१०) प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
११) प्रधान सचिव (ले व को),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) आयुक्त , महिला व बाल विकास आयुक्तालय,म.रा. पुणे.
१३) महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
१४) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
१५) संचालक,लेखा व कोषागरे संचालनालय,म.रा.मुंबई
१६) संचालक,स्थानिक निधी लेखा परीक्षा,कोकण भवन,नवी मुंबई
१७) सर्व उपसचिव ,सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास. नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
१८) उपायुक्त (बालविकास) महिला व बाल विकास आयुक्तालय, म.रा.पुणे.
१९) वित्त विभाग (व्यय-६/अर्थसंकल्प-७/कोषा-प्रशा-२), नियोजन विभाग (का-१४७२) मंत्रालय, मुंबई -३२,
२०) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
२१) अधीक्षक, शासकीय निरीक्षणगृह/विशेषगृह/बालगृह (मुलींचे) , मुंढवा, पुणे.
२२) सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
२३) निवड नस्ती का-८